प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत अनुसूचित जाती (SCSP) उपयोजनेच्या निधी वितरणाबाबत (सन २०२१-२२)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२१/प्र.क्र.१०२/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०२२

**वाचा:-**

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल,२०२०

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४ मे, २०२०

३) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२१-Desk (MDM) दि.२४ मे, २०२१

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१

६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२०/प्र.क्र.१००/ एस.डी.३, दि.२७ जानेवारी, २०२२.

७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२१/प्र.क्र.१०२/ एस.डी.-३, दि.२७ जानेवारी, २०२१.

८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय दि.३१ मार्च, २०२२.

**प्रस्तावना :-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पूर्वीची शालेय पोषण आहार योजना) योजनेंतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२३ मार्च, २०२२ रोजीच्या आदेशान्वये केंद्र हिस्स्याचा पहिल्या हप्त्यातील उर्वरित रु.२३१९७.०८ लक्ष निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण (General), अनुसूचित जाती उपयोजना (SCSP) व अनुसूचित जमाती उपयोजना (TSP) या घटकांतर्गत केली आहे. सदर निधीपैकी अनुसूचित

जाती घटकांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.३१६४.०८ लक्ष निधी राज्यास प्राप्त झाला आहे. सन २०२०-२१ मध्ये प्राप्त केंद्र हिस्स्याच्या प्रमाणात अपुऱ्या अर्थसंकल्पिय तरतूदीमुळे राज्य हिस्स्याचा रु.४९.४१ लक्ष इतका निधी अवितरीत आहे. तसेच, केंद्र शासनाच्या दि.२४ मे, २०२१ रोजीच्या आदेशान्वये प्राप्त निधीस समरुप राज्य हिस्सा रु.२३५३.१७ लक्ष इतका निधी अवितरीत आहे. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या दि.२३ मार्च, २०२२ रोजीच्या आदेशान्वये अनुसूचित जाती घटकांतर्गत प्राप्त केंद्र हिस्स्याचा रु.३१६४.०८ लक्ष व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१८५८.७२ लक्ष व अवितरीत राज्य हिस्सा रु.२४०२.५८ लक्ष असा एकूण रु.४२६१.३० लक्ष इतका राज्य हिस्स्याचा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची विनंती सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत वित्त विभागास करण्यात आली होती. त्यानुषंगाने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भाधिन दि.३१ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्स्याचा रु.३१६४.०८ लक्ष व राज्य हिस्स्याचा रु.४२६१.३० लक्ष असा एकूण रु.७४२५.३८ लक्ष इतका निधी विभागास उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार सदर निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेकरीता अनुसूचित जाती उपयोजना लेखाशिर्षातंर्गत केंद्र हिस्स्याचा रु.३१६४.०८ लक्ष व राज्य हिस्स्याचा रु.४२६१.३० लक्ष असा एकूण रु.७४२५.३८ लक्ष (रुपये चौऱ्याहत्तर कोटी पंचवीस लक्ष अठोतीस हजार फक्त) इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतुदीमधून वितरीत करण्यास व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष** | **सन करीता २२-२०२१ सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद** | **वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|
| १. | मध्यान्ह भोजन योजना (केंद्र हिस्सा ६०%) (२२०२ I७६४ ) | रु.१४५७४.१२ लक्ष | रु .३१६४.०८ लक्ष |
| २. | मध्यान्ह भोजन योजना (राज्य हिस्सा ४०%) (२२०२ I ७७३) | रु.१२६६६.६५ लक्ष | रु.४२६१.३० लक्ष |
| | **एकूण** | **रु.२७२४०.७७ लक्ष** | रु.७४२५.३८ लक्ष |

२. सदरचा शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.२६/अर्थसंकल्प(विघयो), दि.३१ मार्च, २०२२ नुसार तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४११/व्यय-१४, दि.२८ मार्च,२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर निधीचा विनियोग वित्त विभागाच्या दि.०६ मे, २०२१, दि.२४ जून, २०२१ तसेच दि.१४ ऑक्टोंबर, २०२१ रोजीच्या परिपत्रकातील सूचनांनुसार तसेच शासनाने वेळोवळी दिलेल्या निर्देशास अनुसरुन करण्यात यावा.

४. केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात जमा झाल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने दि.२४ मार्च, २०२२ रोजीच्या टिप्पणीन्वये दिले आहेत. सदर निधी वित्त विभागाने वेळोवळी देण्यात आलेल्या निर्देशास अनुसरुन खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१११४९५४५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, pseudonym=9D437DB3701DE5FE5D194241FCB9D73DC26031B1, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2022.04.01 12:49:57 +05'30'

**(प्रमोद पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई

६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर

१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई

१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१८) निवड नस्ती - एस.डी. ३